मराठी थिऑसॉफिकल फेडरेशनची लघु पुस्तकमाला नंबर ६.



# जगद्गुरु येणार असें आम्हीं कां म्हणत आहों ?

मिसेस् ॲनिबेझंट
यांचे व्याख्यानाचा गोषवारा.

धर्मजागृति-मासिकाचे डिसेंबर १९१५ चे अंकांतील
लेखाचें पुनर्मुद्रण.

पुणें येथें
'भूषण ' छापखान्यांत अनंत विनायक पटवर्धन यांनीं
छापिलें व हरि केशव पटवर्धन, बी. ए. एल् एल्. बी.,
यांनीं म० थि० फेडरेशनकरितां पुणें येथें प्रसिद्ध केलें.

डिसेंबर १९१५.

किं[illegible] आणा.

## "थिऑसॉफिकल सोसायटी

### [ जिज्ञासूंकरितां माहिती.

अमेरिकेंत, न्यूयॉर्क शहरीं ता. १७ नवंबर १८७५ इसवी रोजीं थिऑसॉफिकल सोसायटीची स्थापना झाली; व ता. ३ एप्रिल १९०५ या दिवशीं मद्रास (अड्यार) येथें कायदेशीर रीतीनें नोंदून तिला विशिष्ट स्वरूप देण्यांत आलें. कोणत्याही प्रकारच्या भेदभावास स्थल न देतां, स्वतंत्र रीतीनें सत्यसंशोधन करणाऱ्या व्यक्तींची ही संस्था असून, अखिल मानवजातीची आध्यात्मिकदृष्ट्या उन्नति करण्याचा तिचा यत्न आहे व म्हणूनच नास्तिक्यास आळा घालून **सर्वत्र धर्मजागृति करणें हें या संस्थेचें आद्य कर्तव्य आहे.**

या **सोसायटीचे मुख्य तीन उद्देश** येणेंप्रमाणें:—

(१) जात, धर्म, लिंग, वर्ण, रंग इत्यादि कृत्रिम व अकृत्रिम भेद बाजूस ठेवून मानवजातीच्या **बंधुत्वाचा केंद्र** बनविणें.

(२) धर्म, तत्त्वज्ञान व भौतिक शास्त्रें यांच्या **तुलनात्मक अभ्यासास उत्तेजन** देणें

(३) अज्ञात सृष्टिनियम व मनुष्याचे अंगीं असलेल्या गुप्तशक्ति यांचें संशोधन करणे.

थिऑसॉफिकल सोसायटी हा एक विद्यार्थ्यांचा संघ आहे. त्यांत प्रवेश करूं इच्छिणारा विद्यार्थी कोणत्याही धर्माचा अनुयायी असो, अथवा त्यास कोणताही धर्म नसो, त्यामुळें त्यास या सोसायटींत मज्जाव होऊं शकत नाहीं. या सर्वांस सामान्य बंधन म्हणजे उपरिनिर्दिष्ट उद्देशासंबधानें मान्यता हें होय

या सोसायटीच्या तेवीस शाखा पृथ्वीवरील सर्व सुधारलेल्या देशांत पसरलेल्या आहेत व सर्व ठिकाणी हें विश्वबंधुत्वाचें पवित्र कार्य पार पाडण्याचे प्रयत्न यथाशक्ति सुरू आहेत. या सोसायटीचें मुख्य पीठ मद्रासनजीक अड्यार येथें आहे. हिंदुस्थानांतील शाखांचें मुख्य ठिकाण श्रीक्षेत्र काशी येथें आहे. ज्या कोणास जास्त विस्तृत माहिती पाहिजे असेल त्यास ती खालील ठिकाणीं मिळूं शकेल:—

**अड्यार** (मद्रास, एस्.)-रेकॉर्डिंग सेक्रेटरी, थिऑसॉफिकल सोसायटी.

**बनारस सिटी** (युनायटेड प्रॉव्हिन्सेस)—जनरल सेक्रेटरी, थिऑसॉफिकल सोसायटी, इंडियन सेक्शन.

याशिवाय महाराष्ट्रांत मुंबई, पुणें, नाशिक, सातारा, सांगली कोल्हापूर, बेळगांव, धारवाड हुबळी व तसेंच बडोदें, ग्वाल्हेर, इंदूर, देवास, धार, अकोला, उमरावती, यवतमाळ, नागपूर, जळगांव, मालेगांव वगैरे शहरांतून थिऑसॉफिकल सोसायटीच्या शाखा आहेत. तेथें चौकशी केली असतांही सर्व माहिती आ- नंदानें पुरविली जाईल

# जगद्गुरु येणार असें आम्ही कां ह्मणत आहों ?

[ व्याख्यानः—मिसेस बेझंट. * ]

आजच्या व्याख्यानास सुरुवात करतांना प्रथमदर्शनीं जगद्गुरु म्हणजे काय याचें विवरण करूं या. कारण कित्येक माणसें जगद्गुरु या संज्ञेबद्दल अवतार या शब्दाचा उपयोग करितात व त्यामुळें घोंटाळा होतो. अवतार व जगद्गुरु वस्तुतः भिन्न आहेत. जगद्गुरूंपेक्षां अवतार ही व्यक्ति अधिक श्रेष्ठ आहे. अवतार म्हणजे अवतरणारा—वरून खालीं येणारा—असा मूळचा अर्थ आहे. त्रिमूर्तीपैकीं दुसरी व्यक्ति—जीस तुम्ही विष्णु ह्मणतां ती जेव्हां खालीं उतरून मनुष्यदेह धारण करिते तेव्हां तो अवतार झाला. एक युग संपून नव्या युगास सुरुवात व्हावयाची असली म्हणजे अवतार होतो. युगें चार आहेत. हीं चार युगें विशेषतः मानवंशांस अनुलक्षून गणलेलीं आहेत, व या युगांचा आरंभ मनुष्याच्या उत्पत्तीपासून धरावयाचा आहे. त्याच्यापूर्वी सृष्टि नव्हती असें नाहीं. या चार युगांस सुरुवात होण्यापूर्वी मत्स्ययुग, नंतर सरपटणाऱ्या प्राण्यांचें युग किंवा कच्छयुग, पुढें सस्तन प्राण्यांचें युग किंवा वराहयुग असे काळाचे अनेक विभाग होते व या प्रत्येक विभागांत उत्क्रांतीमध्यें विशेष महत्वाचे असे नवीन प्रकार उत्पन्न झालेले आहेत. मनुष्याच्या वंशांसंबंधानें विचार केला तर तेथेंही वेळोवेळीं उत्क्रान्तीत नवीन प्रकार घडून येण्याचा पूर्वीचा क्रम तसाच अव्याहत चालू राहिलेला असतो. मनुष्याच्या उत्क्रान्तीचें एक युग संपावयाचें असलें व दुसरें सुरू व्हावयाचें असलें, उत्क्रमणाच्या मार्गावरील एक मैल सरून दुसरा लागावयाचा

---

* ता. २३।५।१५ रोजीं कोल्हापूर येथें यदांच्या मराठी थिऑसॉफिकल फेडरेशनच्या बैठकींत मिसेस बेझंट यांनीं **Why we believe in the coming of a Teacher** या विषयावर जें व्याख्यान दिलें त्याचा रिपोर्ट. रिपोर्टांत चुकी असल्यास त्याची जबाबदारी व्याख्यात्यावर नसून रिपोर्टरावर आहे.—सं.

असला म्हणजे अवतार होतो. श्रीराम व श्रीकृष्ण हे अवतार होते व दोघांचाही उदय एका युगाचा अंत होत आहे व दुसऱ्यास प्रारंभ होत आहे अशा काळीं झालेला होता. हल्लींचें युग संपून जेव्हां दुसऱ्या युगास सुरुवात होईल तेव्हां कल्की अवताराचा उदय होईल. पुढाल अवतार कल्कीचा आहे व त्याचेपूर्वी दुसरा कोणताही अवतार व्हावयाचा नाहीं.

## जगद्गुरु व अवतार

यांमधील हा भेद लक्षांत ठेविल्यास नसते वाद उत्पन्न होणार नाहींत. जगद्गुरूस अवतार म्हटलें म्हणजे लोकांस वाटलें हें कांहीं तरी नवीन प्रकरण आहे व ते विचारतात कीं, पुढचा अवतार जर कल्कीचा, तर तुम्हीं हा मध्येंच नवीन अवताराचा शोध कोणीकडून काढिलात ? खरें पाहिलें तर हा नवीन अवताराचा शोध नव्हे. कारण जगद्गुरू हे अवतागहून निराळे आहेत. " जगद्गुरु " ही एक पदवी आहे. जीव उत्क्रांतीच्या श्रेष्ठ पायऱ्या एकामागून एक चढत जाऊन एका विशिष्ट पायरीपर्यंत पोंचतो त्यास ही मिळते. ही पदवी मनुष्यकोटींत व देवकोटींत जगद्गुरूची अशी मानलेली असते. या जगद्गुरूच्या गादीचा उल्लेख सर्व धर्मांत आहे, पण नांवें निरनिराळीं आहेत. बुद्धधर्मांत जगद्गुरूस **बोधिसत्व** म्हणतात. ख्रिस्ती धर्मांत **ख्राइस्ट** म्हणतात. हिंदुधर्मांत व बोद्धधर्मांत जगद्गुरूचें पद ही एक गादी आहे असें मानतात व त्या गादीवर वेळोवेळीं निरनिराळे जगद्गुरु येतात, ते पूर्वीं आले व पुढेंही येतील असें त्यांचें मत आहे. ख्रिस्तीधर्मांतील कल्पना निराळी आहे. त्या धर्माच्या अनुयायांस जगद्गुरूंची परंपरा मान्य नाहीं. ख्राइस्ट हा एकटाच जगद्गुरु होऊन गेला, त्याचे आधीं जगद्गुरु झाला नाहीं असें त्यांचें म्हणणें आहे. ख्राइस्टच्यापूर्वी जगास गुरुस्थानीं असलेला असा कोणीच पुरुष नव्हता व प्राचीन काळच्या लोकांस मार्ग दाखवून देणारा असा गुरु नसल्यामुळें ते लोक अज्ञानांत होते, त्या काळीं जगाच्या पारलौकिक हिताचा वाली कोणीच नाहीं अशी स्थिति होती; असा ख्रिस्ती धर्माच्या या मताचा अर्थ होतो. विशिष्ट लोकांसाठीं विशिष्ट काळीं धर्म शिकविण्यासाठीं एकच जद्गुरु उत्पन्न झाला, त्या जगद्गुरूची गादी नाहीं व त्यास आगा नाहीं कीं पिच्छा नाहीं हें ख्रिस्तानुयायांचें मत समजूतदार लोकांस मान्य

होण्यासारखें नाहीं. तें बुद्धिवादांत टिकणार नाहीं. ख्राइस्टच्या पूर्वी जीं अनेक राष्ट्रें झालीं त्या राष्ट्रांतील जनतेनें असें काय पाप केलें होतें कीं, त्यांस योग्य मार्ग दाखवून देणारा गुरु ईश्वराच्या घरीं मिळूं नये ? या प्रश्नास ख्रिस्ती धर्मांतून उत्तर मिळत नाहीं. आम्ही सांगतों म्हणून विश्वास ठेवा, हा " बाबा-वाक्यम् प्रमाणम् " चा ख्रिश्चनांचा न्याय असल्यामुळें तो अर्थात् इतरांस कबूल नाहीं. जद्गुरूंची क्रमवार परंपरा आहे हें मत जाऊन जगद्गुरु एकच झाला, हा कोता विचार ख्रिस्ती धर्मांत इस्रायली धर्मांतून आला. इस्रायली धर्माची दृष्टि आकुंचित होती. ईश्वरानें जग उत्पन्न केल्यास चार हजार वर्षें झालीं. येथपासून त्यांच्या भूगोलज्ञानास सुरुवात झालेली होती. ॲसिरिया, तुर्कस्तान, चीन वगैरे देशांत प्राचीन काळीं जीं मोठमोठीं राष्ट्रें झालीं होतीं त्यांची त्या लोकांस विशेषशी माहिती नव्हती; व जी काय थोडी होती तिकडे डोळेझांक करण्याचा त्यांचा काल असे. त्या लोकांची संख्या लहान होती व आपल्या ह्या छोट्या लोकसमूहाबाहेर विशेषसें वाखाणण्यासारखें कांहीं नाहीं असें समजण्याची त्या लोकांची वृत्ति असल्यामुळें, आपणच काय ते श्रेष्ठ, बाकीचे सर्व तुच्छ, असें त्यांस वाटूं लागलें. अशाप्रकारें मानसिक वातावरणांत कोतेपणा व " ग " ची पीडा पसरलेली असल्यामुळें, जगद्गुरूंची गादी आहे, ते वेळोवेळीं जन्म घेऊन सर्व लोकांस मार्गदर्शक होतात हा विचार मागें पडला व जगद्गुरू एकच व तो एकदांच येतो या आकुंचित कल्पनेस प्राधान्य मिळालें. पण हा कोता विचार आज संमत होणार नाहीं. सर्व जगाविषयीं आज अधिक माहिती उपलब्ध होऊन लोकांच्या विचाराचें क्षितिज सांप्रत मोठें झालेलें आहे. अर्थात् इस्रायल लोकांच्या मनाच्या आकुंचितपणामुळें ख्रिस्ती धर्मांत शिरलेलें हें मत स्वाभाविकपणच मूर्खपणाचें ठरणार आहे.

जगद्गुरूंची परंपरा आहे, वेळोवेळीं धर्मस्थापना करण्यास जगद्गुरु येतात हें मत अधिक सयुक्तिक आहे. तसेंच तें आजच्या माझ्या विचारसरणीस अधिक उपयोगी आहे. कारण इतिहासांत मागें झालेले जगद्गुरु कोणत्या समयीं आलेले होते, त्या वेळची परिस्थिति कशी होती, त्यांच्या येण्यापासून काय काय परिणाम झाले हें इतिहासांत पाहून त्यावरून आजचा काळ कोणत्या प्रकारचा आहे याचा अजमास आपणांस बांधण्यास ठीक पडेल. जगद्गुरूंच्या मागील

परंपरेचा आपण नकाशा पाहिला तर त्यावरून आजच्या परिस्थितीचें मोजमाप घेण्यास या व्याख्यानांत सोपें जाईल. आणि त्यावरून आजच्या काळीं कांहीं विशेष आहे किंवा कसें याचेंही अनुमान ठरवितां येईल. कारण इतिहास ही नुसती जुन्या गोष्टींची जंत्री नाहीं; इतिहास हा भविष्यकाळचा नकाशा आहे व तो आपण स्वतःस मार्गदर्शक करून घेतला पाहिजे. ही दृष्टि ठेऊन आज

## ऐतिहासिक पद्धतीनें

मी प्रस्तुत विषयाचा विचार करणार आहें. अंतर्ज्ञानाच्या दृष्टीनें हा विषय आपणापुढें मांडण्याचा माझा मानस नाहीं. ज्या गोष्टी सर्वांस गम्य नाहींत, ज्यांचा अनुभव सर्वांस मिळण्यासारखा नाहीं त्या गोष्टींचा ऊहापोह करून कांहीं उपयोग नसल्यामुळें या बाबतींतील माझा विशिष्ट अनुभव बाजूस ठेवून ज्या विचारसरणीचीं साधकबाधक प्रमाणें तुम्हांस कळण्यासारखीं आहेत, त्या विचारसरणीचाच मी आज अवलंब करीत आहे. माझ्या बोलण्याचा आपल्या मनाशीं विचार करून सारासारबुद्धीनें माझीं प्रमाणें तोलून मग आपण आपलें मत ठरवावें, अशी माझी विनंति आहे. तुमची या बाबतींत खात्री करावी असा माझा हेतु नाहीं—तुम्हीं या विषयाचा विचार करून माझें म्हणणें आपल्या मनास पटतें किंवा कसें हें पहावें, इतकीच माझी अपेक्षा आहे. एका तासाच्या व्याख्यानानें तुम्ही माझें म्हणणें कबूल करावयास लागाल अशी माझी कल्पना नाहीं; व एका तासाच्या बोलण्यानें तुम्ही तत्काळ माझे चेले बनल्यास मला त्याची किंमतही वाटणार नाहीं. कारण जे लोक एकाचें व्याख्यान तासभर ऐकून त्याच्या म्हणण्यास कबुली देतात ते लोक विरुद्धमताच्या दुसऱ्या व्याख्यात्याचें दुसरें एक व्याख्यान आणखी एक तासभर ऐकून त्याच्याही म्हणण्यास कबुली देण्याकरितां चटकन् पगडी फिरवावयाचे ! नाहीं कोणीं म्हणावें ! तर मी आजच्या प्रसंगीं जी विचारांची दिशा आपणास दाखविणार आहें त्या दिशेनें जाऊन आपण अभ्यास करावा व मग माझें मत पटल्यास मान्य करावें इतकीच माझी इच्छा आहे.

## रूपरेषा.

पुराणें पाहिलीं तर एकामागून एक असे जगद्गुरु होतात असा तेथें विचार सांपडतो. मैत्रेय नामक ऋषीचा पुराणांत उल्लेख आहे. मैत्रेयांचे गुरु उद्दालक

यांनीं ते पुढें जगद्गुरु होतील असें सांगितलेलें पुराणांत नमूद आहे. तुमच्यापैकीं जुन्या विचारांच्या माणसांनीं याचा विचार करावा. अशा प्रकारच्या कल्पना पुराणांतच सांपडत असल्यामुळें त्या नवीन आहेत किंवा अलीकडील थिऑसफिस्टांनीं उठविलेल्या आहेत असें वाटण्याचें कारण नाहीं. पण याच दृष्टीनें विचार करा असें माझें म्हणणें नाहीं. मी जगद्गुरूंच्या आगमनाचा निराळ्या दृष्टीनें विचार करणार आहें. जगद्गुरूंचें येणें व मानववंशाची नवीन घटना यांमध्यें संबंध आहे हें ऐतिहासिक दृष्टीनें दाखवून आज मानवशरीराची नवीन घटना अस्तित्वांत येत आहे याविषयींची शास्त्रज्ञांची कबुली मी आपणांसमोर मांडणार आहें, त्यावरून जगद्गुरूंच्या सांप्रतकालच्या आगमनाचें अनुमान निघतें किंवा नाहीं हें आपणास पहावयाचें आहे. कारण जी गोष्ट अमुक एक परिस्थितींत पूर्वी अनेकदां झाली ती तसल्या परिस्थितींत सांप्रतही होण्याचा संभव आहे असें मानतां येईल. तसेंच मनुष्याची नवीन घटना उत्पन्न होऊं लागली म्हणजे नवीन धर्माची स्थापना होते व त्यामुळें नवीन सुधारणा उदयास येते हेंही मी दाखविणार आहें. आज सर्वत्र कोंडमारा झालेला आहे, आलों याच मार्गानें पुढें जाण्यास वाव नाहीं, तेव्हां नवीन दिशा धरली पाहिजे, हाही विचार आजच्या विवेचनांत येणार आहे, व सर्व प्रमाणांवरून आज जगद्गुरु येण्याचा कितपत संभव आहे याचा हिशेब आपणांस करणें आहे. शिवाय सध्यां जगामध्यें सर्वांत मोठी आवश्यकता कशाची आहे, जगाची गरज काय आहे, याविषयींही आपणांस विचार केला पाहिजे. कारण ज्या माणसास, जगास कोणी तरी नियंता असून त्याच्या देखरेखीखालीं सर्व कारभार चाळत आहे, असें वाटत असेल, त्या माणसाच्या मनास, जगांत सर्वत्र उत्पन्न झालेली जी आवश्यकता तिचा योग्य उपाय व्हावयास पाहिजे आहे असें सहज वाटणार आहे.

## पूर्वींचे जगद्गुरु.

हिंदुधर्मानें **व्यास** नांवाचा पुरुष सर्वविश्रुत केलेला आहे. व्यास हा धर्मग्रंथ लिहिणारा व लोकोपयोगासाठीं इतर धर्मग्रंथांची नवीन तऱ्हेनें मांडणी करणारा असा पुरुष होता असें हिंदुधर्मच सांगत आहे. हिंदुधर्माच्या इतिहासाची पहांट होण्याच्या समयीं उद्भवलेला हा पुरुष अचाट सामर्थ्याचा होता. **व्यास व वैवस्वत मनु** ह्या दोन्ही विभूति समकालीन होत्या हें तुम्हांस विदित आहे.

वैवस्वत मनूचें काम आर्यवंशाच्या शाखा मध्य-आशियांतून देशांतरास पाठविण्याचें होतें; व आर्यवंशाच्या मागें न जातां तेथूनच सुरुवात केली तर व्यास हा पहिला जगद्गुरु होय. तो वैवस्वत मनूचा सहकारी होता. त्यानें स्थापिलेल्या धर्मांत सर्व जग एक आहे, सर्व मनुष्यें बंधु आहेत, तेव्हां परोपकारानें पुण्य लागतें व परपीडन हें पाप होय, ही कल्पना प्रमुख होती. व्यासानंतर मानववंशाची एक नवीन शाखा उत्पन्न होऊन ती पश्चिमेकडे गेली, भूमध्यसमुद्राच्या कांठावर तिनें वसाहत केली, व इजिप्त देशास आर्यसंस्कृतीचें वळण लाविलें. पुढें ईजिप्त देशांत पुनः जगद्गुरु उत्पन्न झाला. हा दुसरा जगद्गुरु होय. त्याचें नांव " **थोथ** " असें असून ग्रीक लोकांनीं त्यास **हर्मीस्** असें नांव दिलेलें आहे. ख्राइस्टच्या पूर्वीच्या युरोपियन ज्ञानाचा उगम हर्मीस् या महापुरुषापासून आहे. त्याच्या संप्रदायांतून युरोपांत ज्ञान पसरलें असल्यामुळें आजच्या पंडितांस त्याचें महत्व वाटत आहे. त्याच्या आगमनानंतर ईजिप्त देशांत आर्यलोकांचें सामर्थ्य भराभर वाढलें, ईजिप्तची संस्कृति उद्यास आली व ती आफ्रिकेच्या दक्षिणभागांत पसरली. पाश्चात्य लोकांच्या कलाकौशल्यामध्यें या इजिप्शियन संस्कृतीचीं चिन्हें सांपडत आहेत. तसेंच अलीकडे दक्षिण आफ्रिकेंत कांहीं शोधकांस तेथील जमीन खणून या संस्कृतीचा पुरावाही मिळालेला आहे. ही संस्कृति ज्यांत पसरलेली होती अशीं आफ्रिकेंत मोठमोठीं राज्यें झालीं व तिची एक लाट उत्तरेकडून अरबस्थानापर्यंत गेली होती. ईजिप्त देशांत आलेल्या ह्या हर्मीस्–जगद्गुरूनें जी धर्मसंस्थापना केली तींत माणसाच्या अंतरंगांतील तेजासंबंधानें विशेष विचार केलेला होता व त्यामुळें त्या धर्माचें वळण एका विशिष्ट प्रकारचें झालेलें होतें.

**नंतर**

त्यापुढें झालेला जगद्गुरु **झोरॅस्टर** हा होय. हा पर्शियन साम्राज्यांत उत्पन्न झाला, आर्यलोकांत उत्पन्न झालेला हा तिसरा जगद्गुरु. त्यानें केलेल्या धर्माच्या मांडणींत शुचित्वाची कल्पना विशेष प्रमुख आहे. त्याच्या काळीं मनुष्यजातीचा निराळा नमुना–निराळा वंश–उत्पन्न झालेला होता व त्यानें लोकसुधारणेस नवीन वळण लाविलें. पारशी लोकांचा वंश भिन्न आहे. पारशी लोक जसे तुम्हांहून तसेच पाश्चात्यांहूनही निराळे आहेत. त्यांचा निराळेपणा आपणांस सहज ओळखतां येतो. झोरॅस्टरास सोडून इतिहासाच्या मार्गानें

अलीकडे चला म्हणजे मध्य-आशियांतून निघालेली आणखी एक आर्यलोकांची शाखा तुमच्या नजरेस पडेल. ज्यांस आपण आज लॅटिन लोक किंवा Latin Races म्हणतों त्या लोकांचे पूर्वज जे ग्रीक वगैरे लोक त्यांची ही शाखा होय. या लोकांचा वंश निराळा आहे व त्या वंशाचें केल्टिक ( Celtic ) हें नांव आहे. या वंशांत **ऑरफियस्** नांवाचा जगद्गुरु झाला. त्यानें प्रसृत केलेल्या धर्मांत " सौंदर्य " ही कल्पना मूलभूत होती, व त्यामुळें ती या लोकांच्या स्वभावांत मुरून राहिलेली आहे. ऑर्फियसूच्या संप्रदायांत गंधर्वविद्या प्रमुख असे. या नवीन वळणामुळें केल्टिक लोकांत सौंदर्याविषयीं अत्यंत अभिरुचि आढळते. ग्रीक लोकांचा धर्म सौंदर्य-प्रधान होता. फ्रान्स, इटली, आयर्लंड, इत्यादिक देशांतील लोक सौंदर्यप्रिय आहेत. बोलतांना अगर लिहितांना फ्रेंच भाषेची रचना ठाकठिकीची व टुमदार जर आपण केली नाहीं तर ' ही फ्रेंच भाषाच नव्हे ' असें आजचे फ्रेंच लोक म्हणतात; इतकीं खोल सौंदर्याचीं मुळें त्या लोकांत गेलेलीं आहेत. या प्रवृत्तीमुळें हा वंश ललितवाङ्मय, कलाकौशल्य, वक्तृत्व वगैरे गोष्टींत पुढें आहे.

## ट्यूटन शाखा.

त्यापुढची शाखा म्हणजे ट्यूटन ( Teuton ) व स्लाव्ह ( Slav ) यांची होय. ह्या लोकांचा प्रकार पूर्वींच्याहून निराळा आहे. रशियन व ट्यूटन लोकांत तर्कशास्त्र चालविणारें मन विशेष विकास पावलेलें आहे. तत्त्वविचारांची आवड, अध्यात्मवृत्ति, सौंदर्यप्रेम इत्यादिक या लोकांत कमी असून अनेक गोष्टींचें अवलोकन करून नवीन शोध लावणें व भौतिकशास्त्राची वाढ करणें हा या लोकांचा विशेष आहे. प्राचीनकाळीं कुटुंब हा समाजाचा घटक मानून त्यावरून समाजाची रचना केलेली होती. पण ट्यूटन लोकांच्या समाजघटनेंत कुटुंबाचें महत्व कमी होऊन व्यक्ति हा समाजाचा घटक झालेला आहे. मनुष्याचीं कर्तव्यें नव्हेत तर मनुष्याचे हक्क-Rights of man या मूलभूत गोष्टीवर त्याची संस्कृति उभारलेली आहे. चढाओढीची शर्यत ही लोकांच्या सुधारणेची गुरुकिल्ली आहे. **ख्राइस्ट** हा या ट्यूटन वंशाच्या आरंभीं आलेला जगद्गुरु होय. ख्राइस्टनें आपल्या धर्माच्या मांडणींत **व्यक्तीस** महत्व दिलें. त्याच्या शिकवणुकींत व्यक्तीस जितकें प्राधान्य आहे, तितकें त्यापूर्वींच्या कोणत्याही धर्मसंस्थापकानें दिलेलें नाहीं. व्यक्तीचें सामर्थ्य वाढावें म्हणून चढाओढ

उत्पन्न झाली व जीवनार्थ कलह या संस्कृतींत विशेष माजला. कशावरही विश्वास न ठेविनां चिकित्सकबुद्धीनें एकसारखा शोध करणें, चिकित्सक-बुद्धीनें सर्व जगतास आव्हान करणें, हे मनाचे धर्म ट्यूटन उपवंशांत विकास पावावयाचे होते म्हणून ही संस्कृति या नवीन वळणावर गेली. व्यक्तींचें प्रस्थ वाढविण्याचा हेतु, पुढील संस्कृतींत त्याचा उपयोग व्हावा हा होता. या एकंदर धोरणास अनुसरूनच प्राचीन ख्रिश्चनांस संमत असलेला पुनर्जन्मवाद नंतर मागें पडला. जन्म एकच, त्यांत जें काय आपण करूं तें करू, एका जन्मींच्या चुका दुरुस्त करण्यास दुसरीकडे कोठेंही अवकाश नाहीं, या जन्माच्यानंतर अक्षय नरकवास किंवा अक्षय स्वर्गवास इत्यादि विचार याच धोरणाच्या अनु-रोधानें ख्रिस्ती संस्कृतींत शिरले, व त्यानें व्यक्तीचें सामर्थ्य अधिक वाढ-ण्यास मदत झाली. मनुष्याच्या पराक्रमास अनेक जन्मांचा निरवधिकाल व विपुल पृथ्वी एवढें क्षेत्र असलें म्हणजे तो तितक्या नेटानें उद्योग करीत नाहीं. एकच जन्म, त्यांत शक्य तितकें सर्व करावयास हवें, असें माणसास वाटूं लागलें म्हणजे तो अधिक जोरानें प्रयत्न करितो. असा माणसाचा स्वभाव असल्यामुळें पुनर्जन्माचें सत्य ख्रिस्ती संस्कृतींतून तात्पुरतें काढून घेण्यांत आलें. ख्राइस्टच्या शिकवणुकींतील दुसरा विशेष म्हणजे "स्वार्थत्याग" हा होय. ख्राइस्टचें चरित्र म्हणजे लोकांसाठीं मूर्तिमंत जीवितत्याग होय. "तुमच्यापैकीं जो सर्वांत मोठा असेल त्यानें इतर सर्वांचें सेवक बनलें पाहिजे" हा ख्राइस्टचा उपदेश होता. सार्वजनिक सेवा व स्वार्थत्याग हीं याच कारणामुळें पाश्चात्य व अमेरिकन लोकांत दिसत आहेत. ज्या लोकांत चढाओढ अधिक विकोपास गेली, त्याच लोकांत स्वार्थ-त्याग करून सार्वजनिक गोष्टींत मन घालून जनतेची सेवा करण्याची हौसही अधिक झालेली आहे, हें सर्वांस दिसतच आहे.

याप्रमाणें मीं आपणांस इतिहासांतील पांच प्रसंग सांगितले. दर प्रसंगांत नव्या मनुष्यवंशाचा (किंवा घटनेचा) उदय, नव्या जगद्गुरूचें आगमन, नव्या सुधारणेची प्राणप्रतिष्ठा, नव्या धर्माची संस्थापना हीं सर्व दिसत आहेत. हे पांच धर्म, पांच जगद्गुरु, पांच संस्कृति व पांच वंश यांचा संबंध लक्षांत आणा.

## पुनश्च एकदां.

आज असला एक नवीन प्रसंग आपणासमोर आहे काय ? मार्गे पांच प्रसंग झाले. सहाव्याची वेळ आली आहे काय ? हा माझा आपणास प्रश्न आहे. त्याचें उत्तर हवें असल्यास, सांप्रत नवीन वंशाची घटना होत आहे काय, याचा शोध केला पाहिजे. आज नवीन नमुना घडला जात आहे असें शास्त्रज्ञ म्हणत आहेत. हें थिऑसफिस्टांचें " खूळ " नाहीं. वॉशिंगटनच्या ब्यूरो ऑफ एथ्नॉलॉजीची अशी कबुली आहे. मनुष्याचा नवीन नमुना हल्लीं उत्पन्न होत आहे, असें त्या संस्थेंतील शोधकांनीं प्रसिद्ध केलें आहे. नव्या नमून्याच्या माणसांच्या डोक्याची ठेवण व आकार कसा असतो, ह्याचें त्यांनीं वर्णन दिलें आहे. चेहेऱ्याचीं मोजमापें व चेहेऱ्याच्या कोनाचे अंश ( facial angle, ) इत्यादिही माहिती त्यांनीं दिली आहे. तेव्हां हा नवीन नमुना आहे, नवीन वंश आहे, हें स्पष्ट आहे. अमेरिकेंत तुम्ही गेल्यास तुम्हांसही हा नवीन नमुना ओळखावयास येईल, इतका तो निराळा आहे. १८९१ सालीं मी अमेरिकेंत गेले होतें. त्या वेळीं तेथें या नवीन वंशाचीं थोडींशीं माणसें माझ्या दृष्टीस पडलीं. पुनः मी गेलें तेव्हां त्यांची संख्या वाढलेली आढळली, व माझ्या शेवटच्या खेपेस मला त्यांच्या संख्येंत पुष्कळच भर पडलेली दृष्टीस पडली. या लोकांची मुद्रा सुबक व कोरींव (finely cut ), नाक सुंदर, शुद्ध–आर्यवंशांतल्यासारखें, व तोंड ( jaw ) चौकोनी दिसतें. चेहेऱ्यावर निश्चय व मनाचा जोम दिसतो. एकंदरींत लोक हुशार असे वाटतात व चेहेरा रेखींव असल्यामुळें शोभिवंत दिसतो. जर आज असा प्रकार दिसत आहे, तर मग मागच्यासारखा प्रसंग आजही आला आहे असें म्हटल्यास तें अगदींच निराधार होईल काय ? मागें पांचदां जी परंपरा दिसली त्यापैकीं एक गोष्ट आपणां सर्वांस आज दिसत आहे. तेव्हां इतर गोष्टीही पूर्वीप्रमाणेंच दिसूं लागतील अशी आम्हीं अपेक्षा केली तर त्यांत असंभवनीय असें काय आहे बरें ? जगद्गुरु येणार याची जरी या प्रमाणावरून तुमची पक्की खात्री झाली नाहीं, तरी ते येण्याचा पुष्कळच संभव आहे हें त्यावरून सिद्ध होतें.

## धर्मजागृति.

लवकरच जगद्गुरु येऊन धर्मसंस्थापना होईल असे दाखविणारीं आणखी इतरही प्रमाणें आहेत. जगाच्या धार्मिक स्थितीकडे दृष्टि फेंकली तर सर्वत्र धर्मजागृतीस सुरुवात झाल्याचा अनुभव येत आहे व हें जगद्गुरूच्या सत्वर येण्याचें चिन्ह आहे. पाश्चात्य देशात अंतरंगवृत्ति ( Mysticism ) धर्मांत अधिक आधिक येत आहे. हिंदुस्थानांतही धर्मास जिवंतपणा येऊं लागला आहे. पुढच्या धर्माचा नमुना कसा असेल, त्याचें वळण कोणत्या प्रकारचे होईल त्याची मला माहिती नाहीं. पण नव्या धर्मांत अध्यात्माचा भाग अधिक येईल असें मला वाटतें. जगांतील इतर धर्मांतील अध्यात्मवृत्तीस त्यामुळें अधिक जोर येऊन या नवीन धर्मातील अध्यात्मस्फूर्ति व जगांतील इतर धर्मांतील अध्यात्मस्फूर्ति–या दोन्ही स्फूर्ति एकच प्रकारच्या आहेत हें सिद्ध होईल, व त्यामुळे सर्व धर्मांत एकच कारणामुळें जिवंतपणा आलेला आहे, हे जनतेस समजून येईल. याच कारणामुळें सर्व धर्मांचीं नातीं परस्परांविषयं प्रेमपूर्ण असतील, असें मला वाटतें. नवी धर्मसंस्थापना झाली म्हणजे बाकीचे धर्म नाहींसें होतील असें नाहीं. नव्या मानववंशासाठीं नवा धर्म असतो, व तो उत्पन्न झाला तरी त्यानें पूर्वीच्या धर्माच्या अस्तित्वास बाध येत नाहीं याची साक्ष इतिहास देत आहे. एका समाजाच्या संस्कृतीस नवे वळण लागलें तरी आज सर्वत्र जगांत असणारे धर्म तसेच पुढें कायम राहातील. पण नवीन धर्मांतील अध्यात्मवृत्ति अधिक जिवंत असल्यामुळें त्याचा परिणाम इतर धर्मांवरही होईल व त्या सर्वांत अंतरंग-ज्ञानाची चांगलीच जागृति होईल. ख्रिस्ती धर्म, महमदी धर्म, वगैरे धर्मांत त्यामुळें सुधारणा होईल. हिंदुधर्मातील ब्रह्मविद्येंतही नवीन जीव येईल, व कर्मकांडांतील विधींचें महत्व कमी होऊन वेदान्ताच्या तत्त्वांचा तुमच्या मनास अधिक अधिक साक्षात्कार व्हावयास लागेल. भावी धर्मसंस्थापनेमुळें पुष्कळ नवीन प्रकार उत्पन्न होतील व अंतरनुभवाचीं नवीन प्रकारचीं माणसें उदयास येतील. शिवाय नवीन धर्माचें धोरण स्वतःस निराळें ठेवण्याचें नसून सर्वग्राही होईल व अर्थात् त्याचा इतर धर्मांवर मोठाच परिणाम पडेल, असें मला वाटतें

## सांखळीचा शेवटचा दुवा.

जगाच्या आजच्या संस्कृतीकडे पाहिलें तरी त्यांतही जगद्गुरूंच्या आगमनाचें चिन्ह दिसून येत आहे. चढाओढीचा कळस होऊन तीही कमी होणार असें दिसत आहे. कारण चढाओढीच्या मार्गानें जितकें पुढें जातां येईल तितके लोक गेलेच आहेत व त्यांच्यापुढें मार्ग खुंटलेला दिसत आहे. तसेंच चढाओढीनें लोकांत किती दैन्य व किती दुःख उत्पन्न होतें, लोक तीमुळें किती मेटाकुटीस येतात हेंही लोकांस समजावयास लागलें आहे. अमेरिकेंत ज्या 'ट्रस्ट' म्हणून संस्था आहेत त्यांत चढाओढीची हद्द झाली आहे. 'ट्रस्ट' म्हणजे मूर्तिमंत शंभरनंबरी चढाओढ होय. आतां या शंभरनंबराचें एकशें एक होणें अशक्य आहे. प्रथम फार मोठ्या प्रमाणावर उद्योगधंद्यांचे संघ झाले. त्या सर्वांची प्रचंड व संघटित रचना होऊन ट्रस्ट अस्तित्वांत आले आहेत व चढाओढीचें शक्तिसर्वस्व त्यांत सांठविलेलें आहे. कोणत्याही पदार्थाची हवी ती किंमत ट्रस्टनें मागावी इतकें त्यांस सामर्थ्य आलें आहे. व सर्व व्यापारधंदा त्यांच्या मुठींत आल्यामुळें ट्रस्ट ठरवील ती किंमत दिल्याविना गिऱ्हाइकांस गत्यंतर नाहीं असा प्रकार झालेला आहे. निपज, आयात, निर्गत, सर्वच ट्रस्टच्या हातांत, तव्हां समाजावर हवी ती किंमत जुलमानें लादतां येते. आतां याच्या पुढें चढाओढीचें पाऊल जाण्यास रीघ नाहीं. हा चढाओढीचा अंत आहे. तसेंच हा सहकारी चळवळीचा आरंभही आहे. अवाढव्य अशी संघटित व सुयंत्र रचना करून त्यापासून ट्रस्ट अस्तित्वांत आले. पुढील संस्कृति चढाओढीची नसून सहकारित्वाची होणार आहे व सहकारित्वाची चळवळ यशस्वी होण्यास तिची घटनाही ट्रस्टप्रमाणें संघटित स्वरूपाची मोठ्या प्रमाणावर व्हावयास पाहिजे. अर्थात् ट्रस्टच्याच पद्धतीनुसार सहकारी संस्थांची उभारणी होईल व म्हणूनच मी म्हणतें, ट्रस्ट ही सहकारी चळवळीची तयारी आहे. तुटक्या व जुजबी प्रयत्नांनीं सहकारी चळवळ यशस्वी होणार नाहीं. ट्रस्टप्रमाणें सहकारी चळवळीस सुयंत्र व्यवस्था हवी व तीही मोठ्या प्रमाणावर हवी, हें ट्रस्टच्या उदाहरणावरून दिसत आहे. अर्थात् हा ट्रस्टचा मार्ग आहे व याच मार्गानें सहकारी चळवळ जाईल, तर ती फलदायक होईल. या सर्व प्रकरणांत भावी संस्कृतीचें वळण प्रतिबिंबित आहे. मीं आतांच सांगितल्याप्रमाणें नवीन वंशाचा उदय, धर्माचें नवीन वळण, संस्कृतीचा नवीन

प्रकार व जगद्गुरूंचें आगमन या गोष्टी परस्परांशीं बद्ध आहेत, त्या सर्वांचा निकट संबंध आहे हें इतिहासावरून आपण नुकतेंच पाहिलें आहे. या गोष्टी-पैकीं शास्त्रज्ञांस नवीन वंश उत्पन्न झालेला दिसत आहे. धर्मांतही सर्व जगभर बदल होईल अशीं चिन्हें दिसत आहेत. संस्कृतीचें वळणही नवीन झाल्या-वांचून गत्यंतर राहिलेलें नाहीं. तर मग नवीन वंश, नवीन धर्म, नवीन संस्कृति व जगद्गुरु हे एका सांखळीचे जे चार दुवे त्यांपैकीं तीन आपणांस दिसत आहेत. तेव्हां ती सांखळी अधिक अधिक स्पष्ट दिसूं लागली म्हणजे तिचा चवथा दुवा जो जगद्गुरु तोही लवकर दिसावयास लागेल असें ठरत नाहीं काय ? म्हणूनच आम्ही त्याची वाट पहात आहों. इतिहासांतील मागील प्रसंग व आजचा प्रसंग यांचें साम्य पुरें होण्यास जगद्गुरूचें येणें गृहीत धरणें भाग आहे. या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन सबंध विषयाचा विचार केला तर जगद्गुरूच्या प्रस्तुत आगमनाचें फार महत्वाचें प्रमाण त्यांत आपणांस मिळणार आहे.

यांत आणखी एका गोष्टीची भर घाला म्हणजे प्राचीनकाळीं वर्तविल्या-प्रमाणें गोष्टी कशा जुळून येतात याविषयीं तुम्हांस नवल वाटेल. ती गोष्ट म्हणजे पासिफिक महासागरांत नवीन जमीन पाण्याखालून वर येत आहे ही होय. ज्वालामुखीचे स्फोट होऊन पासिफिक महासागरांत भूमिभाग वर येत आहे असा शास्त्रज्ञांचा शोध आहे. पुराणांत हें भविष्य सांगितलेलें आहे. हा प्रकार अधिक होऊन एक सबंध खंड कालान्तरानें वर येईल व तें खंड सहाव्या मूलवंशाचें वसतिस्थान होईल. पण त्या गोष्टी फारच पुढील आहेत. त्यांचा प्रस्तुतच्या घडामोडीशीं निकट संबंध नाहीं. कारण हल्लीं सहावा उपवंश उत्पन्न होत आहे व ह्या नव्या खंडाचा संबंध या उपवंशाशीं नसून सहाव्या मूल-वंशाशीं आहे. हा मूलवंश उत्पन्न होण्यास अद्याप पुष्कळच कालावधि आहे हें विसरतां कामा नये असो.

## भौतिकशास्त्रें व समाज.

जी स्थिति संस्कृतीच्या मार्गाची तीच स्थिति शास्त्राची सांप्रत झाली आहे. म्हणजे संस्कृति याच मार्गानें पुढें जावयाची म्हटली तर जसा मार्ग खुंटलेला दिसतो; तसाच प्रकार भौतिकशास्त्राचा होऊं पहात आहे. भौतिक-शास्त्राच्या शोधांचीं साधनें म्हणजे यंत्रें होत, व तीं आजच इतकीं सूक्ष्मग्राही

व नाजुक झालीं आहेत कीं, तीं आणखी अधिक शक्तीचीं व नाजुक होण्यास फारसा वाव राहिलेला दिसत नाहीं. शास्त्रज्ञांच्या यंत्राच्या शक्तीची शेवटची सीमा आतां फार लांब राहिलेली नाहीं. शोध करण्याचीं साधनें नवीन प्रकारचीं उत्पन्न झाल्याविना भौतिकशास्त्रें हल्लींच्याच पद्धतीनें फारशीं पुढें जाऊं शकणार नाहींत. मनुष्याच्या अंतरंगांत गूढ असलेली सूक्ष्मदृष्टि—सूक्ष्मपदार्थ दृश्य करणारी सूक्ष्मदृष्टि—या कामीं शास्त्रज्ञांस उपयोगी पडेल. या शक्तीचा उपयोग केल्याशिवाय भौतिकशास्त्राची प्रगति बंद होईल. सूक्ष्मदृष्टि ज्यामध्यें विकसित आहे अशा माणसांचें प्रमाण पश्चिम अमेरिकेंतील लोकांत अधिक आहे, ही गोष्ट ह्या प्रकरणीं लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे. कारण अमेरिकेंत उत्पन्न होणाऱ्या नवीन वंशाची ती एक खूण आहे. ह्या वंशांतील लोक या नवीन शक्तीचा उपयोग करितील व सृष्टीमध्यें इतरांच्या दृष्टीस न दिसणारे जे " लोक " आहेत त्या सूक्ष्म भुवर्लोकादि लोकांचें प्रत्यक्ष अवलोकन व शोध या वंशांतील माणसें करितील. अशा प्रकारें भौतिकशास्त्रासही एक नवीन वळण लागणार आहे.

•

सामाजिक बाबतींतही चोंहींकडून कोंडमारा झालेला आहे. पैसा मुबलक असल्यामुळें ऐषआरामांत व श्रीमंतींत रहाणारे लोक, व दोनप्रहरची भ्रांत म्हणून आकाशाकडे डोळे लावणारे भुकेबंगाल लोक हे दोघेही एकाच समाजांत एकमेकांसन्निध अस्तित्वांत आले आहेत. पृथ्वीच्या पाठीवर इंग्लंडाइतका मातबर देश दुसरा नाहीं; परंतु इंग्लंड देशांतील एकदशांश लोकांस पोटाची खळगी भरण्याइतकें अन्न मिळत नाहीं. तुमच्याकडे जसे एकषष्ठमांश लोक अस्पृश्य आहेत तसेच हे विलायतेंत आहेत. गरिबी आणि श्रीमंती जशी एकमेकांसन्निध आहे त्याचप्रमाणें चांगले शिकलेले लोक व अज्ञानांत बुडालेले लोक हेही आजच्या समाजांत परस्परांजवळ दिसत आहेत. ही स्थिति दोन दिवस टिकेल. ती जास्त दिवस तशीच रहाणें शक्य नाहीं. वर्तमानपत्रांचा आजच्या काळीं सुळसुळाट आहे व तीं गरीब लोकांस खरी स्थिति कळवीत आहेत. श्रीमंत लोक ऐषआरामांत किती पैसा उधळतात हें वर्तमानपत्रद्वारां गरीब लोकांस आज समजून येत आहे. हा सर्व प्रकार गरिबांच्या डोळ्यांसमोर ढळढळीत दिसत आहे—तेव्हां ही स्थिति अशीच केव्हांही चिरस्थायी व्हावयाची नाहीं, ही स्थिति लोकांस कळूं लागली म्हणजे ते ती

टिकूं देणार नाहींत. भकेनें व्याकुळ होऊन ज्यांचे प्राण आकंठ आले अशीं शेंकडों अर्भकें मरणाच्या द्वारीं बसलेलीं असतांना, अमक्या तमक्या समारंभास शोभेकरितां एक हजार पौंड किंमतीचीं गुलाबाचीं फुलें आणिलीं होतीं हें लोकांनीं वर्तमानपत्रांत वाचलें म्हणजे लोक शांत राहतील काय ? सामाजिक बाबतींत मोठमोठे फरक होणें अत्यंत निकडीचें झालेलें आहे. शिक्षण जिकडे तिकडे सरसहा सुरू करून सर्वत्र साक्षर झालेल्या लोकांचें बंधुत्वाचें नातें समाजांत ओळखल्याविना तोड नाहीं असा प्रसंग येऊन ठेपला आहे, व बंधुत्वाच्या तत्वावर समाजाची नवीन रचना होऊन ती हळू हळू अमलांत यावयाची आहे.

## पृथ्वीची प्रार्थना.

तुमच्या पुराणांत लिहिलेलें आहे कीं, पृथ्वीस भार असह्य झाला म्हणजे पृथ्वी एखादें विशेष रूप धारण करून ब्रह्मदेवाकडे धांव घेते, व आपलें दुःख निवेदन करून त्याची करुणा भाकिते. पुढें ब्रह्मा विष्णूकडे जातो व त्याचें सहाय मागतो व तो पृथ्वीचें दुःख निवारण करण्याचें आभिवचन देतो. हें पुराणांतील वर्णन रूपकात्मक आहे. पृथ्वीवरील लोकसमाजाच्या दुःखाचा स्वर साक्षात् ईश्वराच्या कानापर्यंत जाऊन पोंचतो व तो लोकांची दाद घेतो हें या रूपकांत सांगितलेलें आहे. अज्ञान, दारिद्र्य इत्यादि कारणांनीं निकृष्ट झालेल्या जनांची हांक, ईश्वरास ऐकूं येते हा त्या रूपकाचा अर्थ आहे. निकृष्ट व हीन असे जे लोक त्यांच्या दुःखाचा परिणाम तुम्हांस वाटतें त्यापेक्षां अधिक होतो. दरिद्र्यांच्या अश्रूंमध्यें राजांचीं सिंहासनें पार विरघळून जातात, इतका त्यांच्या अश्रूंचा प्रताप आहे. म्हणूनच " आज दुःखाचा भार पृथ्वीस असह्य झाला आहे, तरी हे दानदयाळ प्रभो, तूं धांव घे व पृथ्वीचें दुःख हलकें कर " हा धांवा पृथ्वीवर सर्वत्र केला जात आहे. ईश्वराचे कान कधींही बहिरे नसतात. दरिद्री लोक साक्षर होत आहेत व त्यांस त्यांची खरी स्थिति कळून येत आहे. आजची अवस्था त्यांस असह्य झाली आहे. त्या स्थितींत त्यांस संतुष्ट ठेवणें अशक्य झालेलें आहे. या दुःस्थितींतून आमचा उद्धार व्हावा, अशी त्यांची इच्छा पृथ्वीच्या वातावरणांत सर्वत्र संचरलेली आहे, व ही आकांक्षा ईश्वराच्या पायांशीं रुजू

झालेली आहे. त्यांनीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें त्याच्याकडून लोकांच्या उद्धाराचें आश्वासन मिळणार असें आम्ही म्हणत आहों. निदान जगाचा योगक्षेम ईश्वर चालवीत आहे अशी ज्यांची श्रद्धा आहे, त्यांस तरी ही आमची अपेक्षा अनाठायीं वाटण्याचें कारण नाहीं.

आणि म्हणूनच जगद्गुरु येणार असें आम्ही कंठरवानें सांगत आहों. जे रंजलेले आणि गांजलेले आहेत त्यांच्यासाठीं ते येणार आहेत. जनसमूहाचा उद्धार करण्याकरितां व रक्ताचें पाणी करून सतत श्रम करीत असणाऱ्या दीन लोकांस सुख देण्याकरितां येणार आहेत. लोकांचें दारिद्र्य फिटावें, पोटाकरितां अष्टोप्रहर काबाडकष्ट करणाऱ्यांच्या चित्तास शांति मिळावी, सामान्य जनता उत्क्रमणपथानें एकसारखी पुढें जावी, पृथ्वीवरील दुःखांची रात्र संपून पहांट उजाडावी ही इच्छा जगद्गुरूंच्या अंतःकरणांत उत्पन्न झालेली आहे. ते जगद्गुरु " दीनाचे दयाळू " " मनाचे मवाळू " स्नेहाळ " " कृपाळू " असे आहेत. ते पूर्वी आलेले असल्यामुळें जगाच्या परिचयाचे आहेत. पूर्वीप्रमाणें पुन्हां एकदां आपल्या अवतारकृत्यास जगांत आरंभ करावा व जनांच्या डोळ्यांचें पारणें फेडावें अशी त्यांची मनीषा आहे. जगांत सर्वत्र कोठेंतरी चुकतें आहे. पृथ्वीवरील अज्ञ जीव मार्गसंमूढ होऊन त्यांस चुकल्याचुकल्यासारखें झालें आहे, व ज्याच्या त्याच्या चित्तास आंतून चमत्कारिक प्रकारची एकसारखी आस लागलेली आहे--अशा परिस्थितींत लोकांच्या आकांक्षेस उत्तर देण्याकरितां दासाभिमानी जगद्गुरू--जगाची उपेक्षा कदापि न करणारे जगद्गुरू--संकटांत उडी घालून पृथ्वीवर धांवत येतील याची आमच्या मनास शंका नाहीं. कारण ते अनाथांस आधारभूत असून जगाचा सांभाळ करण्याचें काम त्यांच्याकडे आहे व नाना संकटांपासून जगताचें रक्षण करावें हें त्या जगद्गुरूचें ब्रीद आहे. त्यांच्या स्वागतार्थ जगाची योग्य तयारी करण्याचें काम आपल्या डोळ्यांपुढें चालू आहे. सांप्रत चाललेलें प्रचंड महायुद्ध त्यांच्या आगमनाचा मार्ग सुगम करीत आहे. लढाईनें जगांतील किल्मिष धुवून निघत आहे व जगद्गुरूंच्या शब्दांस वाव मिळण्याची सोय होत आहे. लढाई हा जगाचा आर्त स्वर आहे. समरभूमिवरून निघालेले हे पृथ्वीचे आर्तस्वर जगद्गुरूंच्या कर्णपथापर्यंत पोंचलेले आहेत. तेव्हां त्यांच्याकडून प्रतिवचन येईल यांत संदेह नाहीं. जगाचा असह्य दुःख-

भार, धर्माच्या जागृतीची सुरुवात, भविष्यकालच्या संस्कृतीचा प्रारंभ, नव्या वंशाची घटना, शास्त्रीय गोष्टींतील झालेला कोंडमारा व सांपत्तिक बाबतींतील पेंच हीं चिन्हें आपल्या डोळ्यांसमोर आहेत. हा चोहोकडून झालेला जगाचा कोंडमारा म्हणजे जगद्गुरूंच्या आगमनाची पूर्वतयारी आहे; व ती सर्वस्वी सिद्ध झालेली आहे म्हणूनच अल्प अवधीनें जगद्गुरु येणार, असें समजून आम्हीं त्यांच्या वाटेकडे डोळे लाविले आहेत.



जगद्गुरूंचे आगमनार्थ पूर्व तयारी करण्याकरितां निघालेल्या

# ' धि ऑर्डर ऑफ धि स्टार इन् धि ईस्ट. '

या संस्थेचे सभासद होण्यास खालील तत्त्वें मान्य असली पाहिजेतः—

( १ ) लौकरच एक मोठे ऋषि पृथ्वीवर अवतरतील अशी आमची समजूत आहे; व ते आल्यावर त्यांची ओळख मनास पटविण्याची पात्रता आमच्या अंगीं यावी अशा तऱ्हेची सांप्रत स्वतःची वागणूक ठेवण्याची आमची इच्छा आहे.

( २ ) ह्यास्तव त्यांस सतत हृदयांत वागविण्याचा व आपले रोजचे व्यवसाय त्यांच्या नांवानें म्हणूनच स्वतःचें सर्व बुद्धिकौशल्य खर्च करून करण्याचा आम्ही यत्न करूं.

( ३ ) इतर कामांतून होईल तो सवड काढून त्यांच्या आगमनाचा मा. सुलभ व्हावा यासाठीं एखादें ठराविक काम करण्यांत आम्ही प्रतिदिवशीं कांही वेळ खर्च करण्याचा प्रयत्न करूं.

( ४ ) आम्ही भक्ति, सौजन्य व उद्योगाची चिकाटी ( निर्धार ), हे गुण आमच्या रोजच्या व्यवहारांत प्रमुखत्वानें आणण्याकरितां झटत जाऊं.

( ५ ) त्यांच्या नांवें किंवा त्यांच्यासाठीं आम्ही जें काय करण्याची खटपट करीत असूं त्या सर्व कार्यार्थ प्रत्येक दिवशीं उद्योगास आरंभ करण्यापूर्वी व शेवटीं थोडा वेळ त्यांचा आशीर्वाद मागण्याचा प्रयत्न करीत जाऊं.

( ६ ) थोरपणा कोणाचेही अंगीं असला तरी त्याची स्वतःस ओळख पटविण्याचा व त्याविषयीं मनांत आदरबुद्धि ठेवण्याचा प्रयत्न करणें व जे लोक आध्यात्मिक दृष्ट्या आमच्यापेक्षां श्रेष्ठ आहेत असें आम्हांस वाटतें त्यांच्याशीं शक्य होईल तितकें मिळून उद्योग करण्यास झटणें हें आमचें विशेष कर्तव्य आहे असें आम्ही समजतों.

वरील तत्त्वें मान्य झाल्यावर संस्थेत दाखल होण्यास चार आण्याचीं तिकिटें पाठवून खालील ठिकाणीं अर्ज करावा. —

ऑर्गनाइझिंग सेक्रेटरी, ऑर्डर ऑफ दि स्टार इन् दि ईस्ट, अड्यार, मद्रा

प्रत्येक इंग्रजी जाणणाऱ्या हिंदी सभासदास " ब्रदर्स ऑफ दि
हें मासिकपत्रक फुकट मिळतें